**संक्षिप्त देयकांची तपशीलवार देयके व उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखापाल कार्यालयास विनाविलंब सादर करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
**शासन परिपत्रक क्रमांकः संक्षिप्त-२०१५/प्र.क्र.१३८ /२०१५/२५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
तारीख: २८ ऑगस्ट २०१५

वाचा :

1) **शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग, क्र.संक्षिप्त-२०१२/प्र.क्र.८/२०१२/विनियम, दि.१४/०३/२०१३**
2) **शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग, क्र.मआख-२०१४/प्र.क्र.४२/विनियम, दि.९/१०/२०१४**

### परिपत्रक:

महाराष्ट्र कोषागार नियमावली १९६८ प्रमाणे संक्षिप्त आकस्मिक खर्चाच्या देयकाद्वारे आहरण केलेल्या रकमांचे तपशीलवार आकस्मिक देयके, आहरण केल्याच्या एक महिन्याच्या आत महालेखापाल किंवा अधिदान व लेखा कार्यालयास सादर करणे बंधनकारक आहे. अशा देयकांचा वेळीच निपटारा न झाल्यास त्याचे प्रारुप परिच्छेदात रुपांतर होऊन लोकलेखा समितीपुढे चर्चेचा भाग होऊ शकतो. ही बाब टाळण्यासाठी संक्षिप्त देयकांचा निपटारा त्वरेने करण्याबाबतच्या सुचना वेळोवेळी शासनस्तरावरुन दिलेल्या आहेत. असे असुनही, भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या राज्य वित्त व्यवस्थेवरील दि.३१ मार्च २०१४ च्या वार्षिक अहवालामध्ये सामान्य प्रशासन विभागाकडे १०५३ संक्षिप्त देयकांची तपशीलवार देयके (परिच्छेद ३.८,परिशिष्ट ३.१०) व २५६ उपयोगिता प्रमाणपत्रे (परिच्छेद ३.१, परिशिष्ट ३.१) प्रलंबित असल्याचे नमूद करण्यात आले आहे.

२. शासन निर्णय,वित्त विभाग, संक्षिप्त २०१२/प्र.क्र.८/२०१२/विनियम,दि.१४ मार्च २०१३ अन्वये पुढीलप्रमाणे सूचना दिलेल्या आहेत. (अ) संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक, वाढीव २ महिन्याच्या कालमर्यादेत सादर न झाल्यास संबंधीत नियंत्रक अधिका-यांकडून त्याबाबतचे तपशीलवार देयक पुढील १ महिन्याच्या आत सादर करण्यात येईल, असे हमीपत्र प्राप्त करुन घेतल्याशिवाय संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांची केवळ त्या योजनेमधील संक्षिप्त

आकस्मिक खर्चाची पुढील देयके पारित करण्यात येऊ नयेत. (ब) वाढीव ३ महिन्यांच्या कालावधीतही संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक सादर न झाल्यास, संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांची केवळ त्या योजनेमधील संक्षिप्त आकस्मिक खर्चाची पुढील देयके पारित करण्यात येऊ नयेत. (क) तपशीलवार देयक प्राप्त झाल्यानंतर कोषागार अधिकारी सदर देयकाचे लेखा परिक्षण करील व त्यानंतर निपटारा प्रमाणपत्रासाठी महालेखापाल कार्यालयाकडे पाठवील. महालेखापालांनी निपटारा प्रमाणपत्र संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांस दयावे व तशी नोंद घेण्यासाठी कोषागारास कळविण्यात यावे. त्यामुळे कोषागारात किती तपशीलवार देयके महालेखापालांना सादर केली व किती प्रलंबित आहेत, यावर नियंत्रण ठेवता येईल.

३. मुंबई वित्तीय नियम,१९५९ मधील तरतूदीनुसार, विशिष्ट प्रयोजनासाठी दिलेल्या अनुदानासाठी विभागीय अधिकाऱ्यांनी अनुदानीत संस्थांकडून उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करणे आवश्यक असते आणि पडताळणीनंतर ही उपयोगिता प्रमाणपत्रे प्रधान महालेखाकार यांना मंजुरीच्या दिनांकापासून १२ महिन्यांच्या आत पाठविणे आवश्यक आहे.

४. भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांनी सन २००९-१० च्या राज्य वित्त व्यवस्था अहवालातील शेऱ्यात नमुद केले आहे की, " उपयोगिता प्रमाणपत्र वेळेत सादर न करण्यामुळे अनुदानांचा गैरवापर होऊ शकतो. मोठया संख्येने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यातील प्रलंबितता असेही दर्शविते की, अनुदाने आणि कर्जे यांच्या उपयोगावरील नियंत्रणासाठी विभागात अस्तित्वात असलेल्या यंत्रणेचे कार्य समाधानकारक नव्हते."

५. राज्य वित्त व्यवस्था अहवालातील प्रलंबित तपशिलवार आकस्मिक देयके व उपयोगिता प्रमाणपत्रांच्या आकडेवारीस अनुसरुन महालेखापाल, मुंबई व नागपूर यांच्या agmaha.nic.in या संकेतस्थळावर online प्रणालीवर प्रलंबित तपशिलवार देयके व उपयोगिता प्रमाणपत्रांची माहिती प्रधानलेखाशीर्षनिहाय, प्रलंबित संक्षिप्त देयक क्रमांकनिहाय व प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्राच्या दिनांकनिहाय संपूर्ण रकमेचे विवरणपत्र उपलब्ध आहे. सदर संकेतस्थळावरील उपलब्ध असलेल्या माहितीच्या आधारे सर्व संबंधीत कार्यासनांनी त्यांचेकडील संबंधीत लेखाशीर्षाखालील प्रलंबित

तपशीलवार आकस्मिक देयकांचा व प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रांचा निपटारा करुन, निपटारा प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयाकडून प्राप्त करुन घेऊन संबंधीत आहरण व संवितरण अधिकाऱ्यांस दयावे व तशी नोंद घेण्यासाठी कोषागारास कळविण्यात यावी. तसेच संबंधीत कार्यासनांच्या अधिनस्त कार्यालयांनाही वरीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.

६. “ ज्या संबंधित अधिका-याच्या नावाने तपशिलवार देयके प्रलंबित आहेत त्यांच्या वैयक्तिक जबाबदारी व हमीवर सदर रक्कम संक्षिप्त देयकाद्वारे कोषागारातून आहरित केली आहे. या संक्षिप्त देयकाची तपशिलवार देयके विहीत मुदतीत सादर न झाल्यास” संबंधित अधिकारी /कर्मचारी यांचेविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी अशा वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.मआख-२०१४/प्र.क्र.४२/विनियम, दि.९ ऑक्टोबर,२०१४ अन्वये सुचना दिलेल्या आहेत.

७. तसेच सचिव समन्वय समितीच्या बैठकीमध्ये प्रलंबित तपशीलवार देयकांबाबत व उपयोगिता प्रमाणपत्र बाबत मा. मुख्य सचिवांनी अशा सुचना दिल्या आहेत की, तपशिलवार देयके किंवा उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त न झालेल्या प्रकरणात गैरव्यवहार/अपहरणाची प्रकरणे दडलेली असू शकतील, म्हणून या विषयाकडे अत्यंत गंभीरतेने लक्ष देणे गरजेचे आहे. ठरलेल्या मुदतीत तपशीलवार देयके व उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित योजनेतील पुढील अनुदान वितरित करु नये.

८. शासन निर्णय , वित्त विभाग, क्रमांक मआख-१०.०३/प्र.क्र.३१/२००३/विनियम, दि.२८.६.२००५ मधील विवरणपत्रात (महाराष्ट्र कोषागार नियम १९६८,खंड-१-मधील नियम क्र.३०३ अनुसार) सादर करण्यात आलेल्या संक्षिप्त देयकांची माहिती व मुंबई वित्तीय नियम १९५९, परिशिष्ट-२२,विवरणपत्र-१ च्या नमुन्यात उपयोगिता प्रमाणपत्रांची माहिती महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात यावी.

९. तरी विभागातील कार्यासनांनी आपल्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयातील प्रलंबित तपशीलवार संक्षिप्त देयके व उपयोगिता प्रमाणपत्र विहीत कालावधीत सादर करण्याबाबत व्यक्तीश: लक्ष देवून भविष्यकाळात संक्षिप्त देयकांची व उपयोगिता प्रमाणपत्रांची प्रलंबितता कमी करण्यासाठी

कालबध्द लक्ष्य ठरवून दयावे. तसेच तपशीलवार संक्षिप्त देयके व उपयोगिता प्रमाणपत्र विहीत कालावधीत महालेखापाल कार्यालयास सादर करण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०८१४१५४२५४६२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pushpa Sabale

Digitally signed by Pushpa Sabale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a6b0ed383ff99d0f9b815fcbc268319abd9df82be6fb54795d9537394c5d313, cn=Pushpa Sabale
Date: 2015.08.31 12:26:57 +05'30'

**(पु.प्र.साबळे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई ३२.
२.सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,३२

**प्रत :**

१) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२) मा.राज्यमंत्री (सा.प्र.वि.) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई ३२.
४) प्रधान सचिव,वित्त विभाग(विनियम शाखा) , मंत्रालय,मुंबई ३२
५) मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय,मुंबई.
६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
७) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र,नागपूर
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व),मुंबई
११) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१२) निवडनस्ती.